**खेलो इंडिया राष्ट्रीय युवा स्पर्धा, २०२२ मध्यप्रदेश येथील स्पर्धेमधील विजेत्या खेळाडूंना रोख पारितोषिक रक्कम तसेच सन्मान सोहळा कार्यक्रमाच्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण -३३२३/प्र.क्र. ०४/ क्रीयुसे-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : २९ मार्च, २०२३ .

<u>वाचा :-</u>

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. केआयपी३१६/प्र.क्र.८७/क्रीयुसे १, दिनांक २० नोव्हेंबर, २०१८.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, केआयपी-२०२२/प्र.क्र.१०१/ क्रीयुसे-१, दिनांक १६ सप्टेंबर, २०२२.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, केआयपी-२०२२/प्र.क्र.१०१/ क्रीयुसे-१, दिनांक ९ डिसेंबर, २०२२.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, संकीर्ण-३३२३/प्र.क्र.०४/ क्रीयुसे-१, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२३.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.खेयुक्री/खेलो इंडिया/पाविपा/२०२२-२३/का-४/८२६१, दिनांक २८ फेब्रुवारी, २०२३.

<u>प्रस्तावना:-</u>

खेलो इंडिया - क्रीडा विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम" ही केंद्र पुरस्कृत योजना शासन निर्णय, दिनांक २०.११.२०१८ अन्वये राज्यात लागू करण्यात आलेली आहे. सदर योजनेनुसार, देशातील युवा खेळाडूंकरिता वार्षिक खेळांच्या स्पर्धेचे आयोजन करण्यात येते. त्यानुसार, दिनांक ३१ जानेवारी ते ११ फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत मध्यप्रदेश येथे पाचव्या खेलो इंडिया राष्ट्रीय स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते. या स्पर्धेत महाराष्ट्र राज्याच्या संघाने ९७ सुवर्ण, १०४ रौप्य व ६७ कांस्य अशी एकूण २६८ पदके जिंकून एकूण पदकतालिकेमध्ये प्रथम क्रमांक पटकाविला आहे.

वैयक्तीक तसेच सांघिक खेळ प्रकारांमधील खेळाडूंची निवड, १५ दिवसांचे स्पर्धापूर्व प्रशिक्षण शिबिर तसेच, मध्यप्रदेश येथील प्रत्यक्ष स्पर्धास्थळी उपस्थित राहण्यासाठी संघातील खेळाडू, क्रीडा मार्गदर्शक, सहाय्यक मार्गदर्शक व व्यवस्थापक यांच्यासाठी जाण्याचे विमान प्रवासभाडे तसेच, निवड चाचणी व प्रशिक्षण शिबिरासाठीचा निवास व भोजन खर्च, प्रवासखर्च, वैद्यकीय खर्च, क्रीडा गणवेश व क्रीडा साहित्य खरेदी खर्च इ. च्या खर्चासाठी दिनांक ०९.१२.२०२२ अन्वये ४ थ्या खेलो इंडिया राष्ट्रीय स्पर्धेच्या रोख बक्षिस व

पारितोषिक वितरण सोहळ्यासाठी वितरीत केलेल्या परंतु आहरित न केल्यामुळे अखर्चित असलेल्या रु. ८६७.५० लक्ष निधीमधून रु.२,१०,९७,७००/- इतका निधी वितरीत करण्यास संदर्भाधीन क्र. (४) येथील शासन निर्णयान्वे मान्यता देण्यात आली आहे.

२. मध्यप्रदेश येथे झालेल्या खेलो इंडिया राष्ट्रीय युवा स्पर्धा, २०२२ मधील सुवर्ण पदक विजेत्या खेळाडूंना प्रत्येकी रु. ५.०० लक्ष, रौप्य पदक विजेत्यांना प्रत्येकी रु.३.०० लक्ष, कास्य पदक विजेत्या खेळाडूंना प्रत्येकी रु. २.०० लक्ष व सहभागी खेळाडूंना प्रत्येकी रु.०.५० लक्ष याप्रमाणे रोख पारितोषिक म्हणून प्रदान करण्यात यावी. तसेच मिशन प्रमुख, क्रीडा मार्गदर्शक, व्यवस्थापक व सहाय्यक यांना रु. ५,०००/- पर्यंतच्या भेटवस्तू प्रदान करुन गौरविण्यात यावे, असे प्रस्तावित करण्यात आलेले असून त्यासाठी रु.१०,६७,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी सदुसष्ट लक्ष मात्र) इतका निधी वितरीत करण्यास व त्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत संदर्भाधीन क्र. (५) येथील पत्रान्वये शासनास विनंती केली आहे.

३. त्याअनुषंगाने ४ थ्या खेलो इंडिया राष्ट्रीय, २०२१ या स्पर्धेच्या रोख बक्षिस व पारितोषिक वितरण सोहळ्यासाठी वितरीत केलेल्या परंतु आहरित न केल्यामुळे अखर्चित असलेल्या रु. ८६७.५० लक्ष निधीमधून वितरीत केलेल्या रु.२,१०,९७,७००/- इतक्या निधीची प्रतिपूर्ती करण्यासाठी तसेच मध्यप्रदेश येथे झालेल्या ५ व्या खेलो इंडिया राष्ट्रीय युवा स्पर्धा, २०२२ मधील खेळाडू, मिशन प्रमुख, क्रीडा मार्गदर्शक, व्यवस्थापक व सहाय्यक यांचा गौरव करण्यासाठी/पारितोषिके देण्यासाठी रु.१०,६७,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी सदुसष्ट लक्ष मात्र) इतका निधी अशा एकूण १२,७७,९७७००/- (अक्षरी रुपये बारा कोटी सत्याहत्तर लक्ष सत्यान्नव हजार सातशे फक्त) इतक्या निधीस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मध्यप्रदेश येथे आयोजित केलेल्या ५ व्या खेलो इंडिया राष्ट्रीय युवा स्पर्धा, २०२२-२३ राष्ट्रीय स्पर्धेतील राज्यातील सुवर्ण पदक विजेत्या खेळाडूंना प्रत्येकी रु. ५.०० लक्ष, रौप्य पदक विजेत्यांना प्रत्येकी रु.३.०० लक्ष, कास्य पदक विजेत्या खेळाडूंना प्रत्येकी रु. २.०० लक्ष व सहभागी खेळाडूंना प्रत्येकी रु.०.५० लक्ष याप्रमाणे रोख पारितोषिके व सन्मानचिन्ह देणेसाठी तसेच, सर्व खेळाडू व पदाधिकारी यांना स्मृतिचिन्ह, खेळाडूंचा प्रवास खर्च (निवासस्थान ते समारंभ स्थळ व परत), समारंभ कालावधीत अल्पोपहार व भोजन आणि समारंभासाठी करावयाच्या तयारीसाठी सादिल खर्च व ४ थ्या खेलो इंडिया राष्ट्रीय, २०२१ या स्पर्धेच्या रोख बक्षिस व पारितोषिक वितरण सोहळ्यासाठी वितरीत केलेल्या परंतु आहरित न केल्यामुळे अखर्चित असलेल्या रु. ८६७.५० लक्ष निधीमधून वितरीत केलेल्या रु.२,१०,९७,७००/- इतक्या निधीची प्रतिपूर्ती करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. खालील विवरणपत्रामध्ये दर्शविलेल्या बाबीकरिता रु. २,१०,९७,७००/- (रुपये दोन कोटी, दहा लक्ष, सत्त्याण्णव हजार, सातशे फक्त ) व रु.१०,६७,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी सदुसष्ट लक्ष मात्र) इतका निधी अशी एकूण १२,७७,९७७००/- (अक्षरी रुपये बारा कोटी सत्याहत्तर लक्ष सत्यान्नव हजार सातशे फक्त) एवढ्या खर्चासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

***<u>खर्चाच्या बाबी</u>***

| अ.क्र. | खर्चाची बाब | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | ५ व्या खेलो इंडिया राष्ट्रीय युवा स्पर्धा, २०२२ पदक विजेत्या खेळाडूंना तसेच स्पर्धेत सहभागी खेळाडूंकरीता रोख रक्कमेचे पारितोषिक देणे यांसाठी निधी | रु.१०,१४,५०,०००/- |
| २. | खेलो इंडिया राष्ट्रीय युवा स्पर्धा, २०२२ मधील पदक विजेते खेळाडू, मार्गदर्शक व व्यवस्थापक यांचा गौरव समारंभ यांसाठी आयोजित करण्यात येणाऱ्या सन्मान सोहळ्याच्या कार्यक्रमासाठी स्मृतीचिन्हे, खेळाडूंचा प्रवास खर्च (निवासस्थान ते समारंभ स्थळ व परत), समारंभ कालावधीत अल्पोपहार, निवास व भोजन आणि समारंभासाठी करावयाच्या तयारीसाठी सादिल खर्च इ. बाबींवरील खर्च | रु.५२,५०,०००/- |
| ३. | खेलो इंडिया युथ गेम्स-२०२२-२३ साठीच्या निवड चाचणी, प्रशिक्षण शिबिर व मध्यप्रदेश येथील स्पर्धास्थळी उपस्थित राहण्यासाठी खेळाडू, क्रीडा मार्गदर्शक, सहाय्यक मार्गदर्शक व व्यवस्थापक यांच्यासाठी खेलो इंडिया, हरियाणा करीता असलेल्या निधीतून केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती करणेसाठी निधी. | रु. २,१०,९७,७००/- |
| | (अ+ब+क) एकूण - | रु. १२,७७,९७७००/- |

(अक्षरी रुपये बारा कोटी सत्याहत्तर लक्ष सत्यान्नव हजार सातशे फक्त)

३. उपरोक्त मंजूर निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी, मागणी क्र. ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (०५)(०६) शालेय क्रीडा स्पर्धाचे आयोजन (कार्यक्रम) (२२०४ ५६३५), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या योजनेअंतर्गत उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१९५१०६८२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.03.29 19:57:42 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
९. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१०. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (संचालनालयामार्फत )
१२. सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
१३. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय,
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कार्यासन क्रीयुसे-२ व क्रीयुसे-३
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).